<u>जिल्हा परिषद व पंचायत समितींच्या</u>
<u>इमारतींच्या देखभाल दुरुस्ती साठी</u>
**नविन लेखाशिर्ष निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१६/प्र.क्र. २८६ (भाग-१)/ पं.रा.-७**
**बांधकाम भवन, ७ वा मजला, २५ मर्झबान पथ,**
**फोर्ट, मुंबई ४००००१**
**तारीख: २३ मार्च, २०१७**

<u>वाचा -</u>

१) कार्यालयीन आदेश क्र.विसूची-२४१५ /प्र.क.६३/आस्था-१,दि.२७.१०.२०१६
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई यांचे पत्र क्र. ख. वि. / चा-१ / ग्रा.वि.वि.ज.सं.वि./ यू ओ आर-१६०/२०१६-१७, दि.०२ मार्च २०१७

<u>प्रस्तावना -</u>

राज्यातील जिल्हा परिषदांना बांधकाम व इमारत देखभाल इत्यादी विविध प्रयोजनासाठी सार्वजनीक बांधकाम विभागाकडून दरवर्षी अनुदान उपलब्ध करुन दिले जाते. हे अनुदान ग्राम विकास विभागामार्फत थेट जिल्हा परिषदांना उपलब्ध करुन देण्यासाठी व त्यावर नियंत्रण ठेवण्यासाठीचा प्रस्ताव सार्वजनीक बांधकाम विभागाच्या मान्यतेसाठी सादर केला होता. वित्त विभागाच्या सहमतीने जिल्हा परिषद अंतर्गत करण्यात येणारी बांधकामे व त्या अनुषंगाने इतर अनुषंगीक खर्चासाठी त्या संबंधीचे लेखाशीर्ष ग्राम विकास विभागाकडे हस्तांतरीत करण्यास सार्वजनीक बांधकाम विभागाने मान्यता दिली आहे. त्याअनुषंगाने, जिल्हा परिषद व पंचायत समितींच्या इमारतींच्या देखभाल दुरुस्तीसाठी नवीन लेखाशिर्ष निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-** जिल्हा परिषद व पंचायत समितींच्या इमारतींच्या देखभाल दुरुस्ती साठी नविन लेखाशिर्ष निर्माण करण्यासाठी पुढीलप्रमाणे लेखाशिर्ष निर्माण करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| मराठीत लेखाशिर्ष | इंग्रजीत लेखाशिर्ष |
|---|---|
| मागणी क्र. एल-०३ | Demand No L-03 |
| २०५९, सार्वजनिक बांधकामे | 2059- Public Works |
| ८०- सर्वसाधारण | 80- General |
| १९६ जिल्हा परिषदा/जिल्हा स्तरीय पंचायतींना सहाय्य | 196-Assistance to Zilla Parishad / District Level Panchayats |
| (०१) स्थानिक ( स्तर) क्षेत्रातील योजना | (01) - Schemes in the Local Sector |
| (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १८२ अन्वये इमारतींच्या दुरुस्तीसाठी जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदान | (01)(01)- Purposive Grants to Zilla Parishads under Section 182 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samities Act 1961 for Repairs to Buildings |
| २७ लहान बांधकामे | 27 Minor Works |
| सी.आर.सी.- २०५९४५३१ | CRC -20594531 |

२. सदरचा शासन निर्णय महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई यांच्या संदर्भांकित क्र. २ च्या पत्रान्वये तसेच, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९/अर्थ-१७, दि.०४.०३.२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०३२३१२३३१४८०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2017.03.23 12:49:33 +05'30'

**(दि.बा.पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र १, २ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा) मुंबई/नागपूर

२. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, फोर्ट मुंबई
३. सचिव, मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन,मुंबई
४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
५. सर्व सह सचिव / उपसचिव ग्रा.वि.व ज.सं.वि. बांधकाम भवन / मंत्रालय
६. सर्व अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
७. सर्व कार्यकारी अभियंता (बांध) जिल्हा परिषद
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९. निवासी लेखाधिकारी, मुंबई
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१७) मंत्रालय,मुंबई
१२. नियोजन विभाग (कार्यासन १४११/ १४१४),
१३. निवड नस्ती (पं.रा.-७), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई.